**राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY)**

सन २००९-१० मध्ये विदर्भातील चार जिल्ह्यांत बोडी दुरुस्ती/नुतनीकरण कार्यक्रमाचा निधी वितरित करणेबाबत

**महाराष्ट्र शासन,**
**ग्रामविकास व जलसंधारण विभाग,**
**शासन निर्णय क्र.राकृयो-२००९/प्र.क्र.६४/जल-१२**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२.**
**दिनांक : ३१ मार्च,२०१०**

संदर्भ :-

१) शासन निर्णय, कृषि प पदुम विभाग, क्र.समिती-२००७/प्र.क्र.१/राकृवियो कक्ष, दि.२० सप्टेंबर,२००७.
२) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. राकृयो- २००८/प्र.क्र.११३/जल-१२, दि.१५ जानेवारी, २००९व दि. २० मार्च, २००९
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राकृवि -२००९/प्र.क्र.७८/राकृवियो कक्ष, दि.१ ऑगस्ट, २००९
४) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र. मग्रारो-२००९/ प्र.क्र.१६६/मग्रारो-१, दि. २० जानेवारी, २०१०
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. राकृवि -२००९/प्र.क्र.१०२/राकृवियो कक्ष, दि.२२ जानेवारी, २०१०
६) शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र. राकृयो- २००९/प्र.क्र.६४/जल-१२, दि.१५फेब्रुवारी, २०१०
७) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांचे पत्र क्र.मृदसं/राकृवियो-बोडी/मृद-४/१२७७/२०१०, दि. २५ मार्च, २०१०

**<u>प्रस्तावना</u>** :-

राष्ट्रीय विकास परिषदेने (NDC) पारीत केलेल्या ठराव क्र.५३ नुसार अकराव्या पंचवार्षिक योजनेत ४ टक्के कृषि विकासाचे उद्दिष्ट ठरविले आहे. हे लक्षात घेऊन केंद्रीय कृषि मंत्रालयाने राष्ट्रीय कृषि विकास योजना (RKVY) जाहीर केलेली आहे. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत केंद्र शासनाने प्रसिध्द केलेल्या मार्गदर्शक सुचनेनुसार मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाधीन दि.२० सप्टेंबर,२००७ च्या शासन निर्णयान्वये राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समिती गठीत करण्यात आलेली आहे. या समितीच्या दि.११ जून,२००९ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार सन २००९-१० मध्ये विदर्भातील भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या ४ जिल्ह्यांत "बोडी दुरुस्ती/नुतनीकरण" कार्यक्रमास मान्यता दिली असून, या करिता कृषी व पदुम विभागाच्या संदर्भ क्र. ३ मधील दि. १ ऑगस्ट, २००९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यतेसह रु.५.०० कोटी निधी मंजूर केला आहे.

राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीच्या वरील मान्यतेनुसार राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत "बोडी दुरुस्ती/नुतनीकरण" हा कार्यक्रम सन २००९-१० मध्ये विदर्भातील ४ जिल्ह्यांत राबविण्यास वर नमूद दिनांक १५फेब्रुवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे असून त्यासाठी १००० बोडी दुरुस्तीचे उद्दिष्ट निश्चित करण्यात आले आहे. यासाठी मंजूर असलेल्या रुपये ५.०० कोटी निधी कृषी व पदुम विभागाच्या दि. २२ जानेवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. हा निधी क्षेत्रिय कार्यालयांना वितरित व खर्च करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u>** :-

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००९-१० मध्ये विदर्भातील भंडारा, गोंदिया, चंद्रपूर व गडचिरोली या

२/-

४ जिल्ह्यांत दि.१५ फेब्रुवारी, २०१० च्या शासन निर्णयान्वये एकूण १००० इतक्या उद्दिष्टासह "बोडी दुरुस्ती /नुतनीकरण कार्यक्रमास" मान्यता देण्यात आली आहे. त्यासाठी मंजूर असलेला रु.५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत बोडी दुरुस्ती/नुतनीकरण कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधीन दि.१५ फेब्रुवारी, २०१०च्या शासन निर्णयातील नमूद केलेल्या अटी व शर्ती तसेच कृषि विभागाच्या संदर्भाधीन दि.२२ फेब्रुवारी,२०१० च्या शासन निर्णयातील योजनेच्या अंमलबजावणी संदर्भात दिलेल्या सूचना लागू राहतील.

३. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत सन २००९-१० मध्ये बोडी दुरुस्ती / नुतनीकरण कार्यक्रमास रु. ५.०० कोटी प्रकल्प किंमतीसह मान्यता दिली असून, याकरीता आता शासन निर्णय, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, दि. २२ जानेवारी, २०१०अन्वये रु.५.०० कोटी (रुपये पाच कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णयात नमुद करण्यात आल्याप्रमाणे आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी हा निधी संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना धनादेशाद्वारे अदा करावयाचा आहे. सदर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. संबंधीत जिल्ह्याला मंजूर केलेला निधी जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत केलेल्या **"आत्मा"** संस्थेच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यासही शासन मान्यता देत आहे. मंजूर केलेला निधी त्याच कामावर खर्च होईल याची दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित अधिका-याची राहील.

४. या शासन निर्णयान्वये बोडी दुरुस्ती/ नुतनीकरण योजनेचा निधी वितरित करण्यास व सदर निधी आत्मा संस्थेच्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यास संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे यांना प्राधिकृत करण्यात आले असले तरी या योजनेची कामे मशिनरीच्या सहाय्याने करण्यासाठी आवश्यक ते मापदंड निश्चित करण्याची बाब सक्रीय विचाराधीन असून हे मापदंड स्वतंत्रपणे कळविण्यात येतील. तो पर्यंत प्रत्यक्ष योजनेवर कोणताही खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधितांनी घ्यावी.

५. सदर शासन निर्णय शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१००३३११७४७००००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रेखा भिडे )
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,

मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री (जलसंधारण), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री,(जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
सर्व मा. मंत्री, राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्यस्तरीय जलसंधारण सल्लागार परिषद.
मुख्य सचिव यांचे सचिव,
सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य,पुणे
मुख्य अभियंता,लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),पुणे
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे,(स्थानिक स्तर)
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व सहसंचालक,सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व मुख्य वनसंरक्षक,
सर्व उपवनसंरक्षक,
सर्व उपायुक्त (विकास),
कार्याध्यक्ष, आदर्शगांव संकल्प व प्रकल्प समिती
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
नियोजन विभाग/ वित्त विभाग/ कृषी विभाग (राकृवियो)
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व उप सचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी (जलसंधारण उपविभाग), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय.
निवड नस्ती / जल-१२